# जादूगार आजीची भेट

टोमी द पाओला

अनुवाद: सुजाता गोडबोले



झोए, जिना, जॅरेट

आणि अर्थात राल्फ

यांच्यासाठी



डिसेंबर महिना सुरू झाल्यापासून कलेब्रिया गावातील जादूगार आजीसह सर्वजण आपल्या स्वयंपाकघरात आणि जेवणाच्या टेबलाशी काम करण्यात गढून गेले होते.



सगळ्यात पहिल्यांदा, ६ डिसेंबरला होता सेंट निकोलसचा सण.

सेंट निकोलसला मुले फार आवडत असत, म्हणून त्यादिवशी जेवायला काय करायचे ते ठरवण्याचा मान मुलांचा.







पुढचा, सेंट ल्युसीचा सण होता डिसेंबरच्या १३ तारखेला. तिच्या सन्मानासाठी विशेष फळे आणि रिकोटा चीज घातलेला एक खास गोड पदार्थ बनवला जातो.



आपल्या वडिलांना बेकरीत मदत करण्यासाठी बांबोलोनाला काही दिवस गावात परत जावे लागले, तेव्हा अँथनीला एक मस्त कल्पना सुचली.








दररोज आजीने सांगितलेली वेगवेगळी कामे करण्यात अँथनी देखील खूप व्यस्त होता.



“आजी, आता तुला मदत करायला बांबोलोना नाही आहे, तर मी स्वयंपाकघरात तुला मदत करायला येऊ का?” अँथनीने आजीला विचारले.



“अँथनी, अरे तू मला विचारलेस, यातच सर्व काही आले. पण मला आता तरी काही मदत नको आहे, शिवाय तुला इतरही खूप कामे आहेतच की!” आजीने उत्तर दिले.

“हो आजी, तू म्हणतेस ते ही खरे आहे.” अँथनी हसून म्हणाला.



‘मी थोडक्यातच वाचले म्हणायचे!’ आजीच्या मनात विचार आला.



डिसेंबर २४ म्हणजे नाताळच्या आधीचा दिवस. ‘सात माशांच्या’ या सणासाठी गावातल्या प्रत्येक घरात माशांचे वेगवेगळे पदार्थ बनत होते.

या दिवशी इतर कोणतेच मांसाहारी पदार्थ बनवले जात नसत आणि नाताळच्या आदल्या रात्री मध्यरात्रीची प्रार्थना झाल्याशिवाय कोणीच मांस खात नसत.





चर्चमधली मध्यरात्रीची प्रार्थना झाल्यावर गावातले सगळे लोक दरवर्षीप्रमाणे जादूगार आजीच्या डोंगरावरच्या घरी खास नाताळच्या मेजवानीसाठी आले.

अनेक टेबलांवर भरपूर स्वादिष्ट खाद्यपदार्थ मांडून ठेवले होते.





'झंपोनारी' म्हणजे अब्रूझी या गावातले मेंढपाळ गाण्याचा विशेष कार्यक्रम करण्यासाठी आले होते.

बाळ येशूचा जन्म साजरा करण्यासाठी गावातले लोक आणि मुले चांदण्यात नाच करून आपला आनंद व्यक्त करत होते.



पहाट होऊ लागल्यावर गावातले लोक आपापल्या घरी झोपण्यासाठी जाऊ लागले. कारण अजून आठवडाभर तरी इतर सण साजरे करायचे होते.



३१ डिसेंबरला म्हणजे नव्या वर्षाच्या पूर्वसंध्येला सेंट सिल्व्हेस्टरचा सण होता.



“अँथनी, आज तू मसुराचे सूप आणि तांदळाचे पुडिंग खाल्लेच पाहिजे हं, नाहीतर तुझे पुढले वर्ष वाईट जाईल.” आजीने अँथनीला समजावले.



“आजी, आज गावात नव्या वर्षानिमित्त होळी करतील, मी पहायला जाऊ का? सगळेजण तिथे जमतील.” अँथनीने आजीला विचारले.

“हो, जरूर जा! पण सांभाळून. बरोबर मध्यरात्री चर्चची घंटा वाजवतील, तेव्हा एखाद्या दारात नाही तर कमानीखाली लपून बस. तुला माहित आहे ना, लोक आपल्याला नको असलेले सामान त्यावेळी खिडकीतून खाली फेकून देतात. मी असं ऐकलं आहे की मागल्या वर्षी अनिताबाईंनी त्यांची जुनी शेगडी खिडकीतून खाली फेकली, तेव्हा आपले मेयर अगदी थोडक्यात बचावले म्हणे.”

“मी नीट लक्ष ठेवीन.” अँथनी म्हणाला.

“हो, आणि जाताना लाल रंगाचे आतले कपडे घालायला विसरू नकोस. नवीन वर्षाच्या स्वागताला सगळ्यांनी लाल रंगाचे आतले कपडे घालायचे असतात. तो शुभशकुन मानतात.”



५ जानेवारीला, एपिफानिच्या पूर्वसंध्येला, म्हणजे तीन राजांच्या सणाच्या दिवशी सर्वजण परत स्वयंपाकाला लागले, पण यावेळेस हा स्वयंपाक त्यांच्या प्राण्यांसाठी होता.



अशी एक आख्यायिका आहे की या सणाच्या आदल्या रात्री मध्यरात्र झाली की सगळे प्राणी एकमेकांशी बोलू शकतात. येशू बाळाचा तबेल्यात जन्म झाल्यावर बैल आणि घोडा यांनी गरम फुंकर घालून थंडीच्या वेळी बाळाला उबदार ठेवले म्हणून त्यांना हा वर मिळाला आहे.

म्हणून गावातले लोक आपल्या प्राण्यांसाठी छान खाद्यपदार्थ बनवतात. आपले मालक आपल्याला वाईट वागवतात किंवा चांगले खायला देत नाहीत असे त्यांनी एकमेकांना सांगायला नको!





जादूगार आजीने देखील तिच्या सशासाठी, मोरासाठी, कबुतरासाठी आणि खास करून बकरीसाठी चांगले जेवण तयार करायला घेतले.

स्वयंपाकघरातून इतका छान वास दरवळत होता की अँथनीच्या तोंडाला चांगले पाणी सुटले. आजीने त्याला जेवायला आत बोलावले, तेव्हा तर तो दारावर धडकलाच!





पण टेबलावर तर त्याच्यासाठी आजीच्या जादूच्या हंडीतील साधा पास्ता होता. बाजूच्या ओट्यावर मात्र चार भांडी ठेवलेली होती, आणि त्यातून खमंग वास येत होता.

“ते काय आहे?” अँथनीने विचारले.





“ते ना, ते आपल्या प्राण्यांसाठी केलेले खास पदार्थ आहेत. आज त्यांचा सण आहे ना! सशासाठी आहेत ही गाजरे, मोरासाठी मक्याची बिस्किटे, कबुतराला हे गोड धान्य, आणि बकरीसाठी नवलकोल मध्ये खास हिरवा पाला भरला आहे. तुझा पास्ता खाऊन झाला की लगेच बकरीबाईसाठी तिचे खास जेवण घेऊन जा.”



अँथनी बकरीच्या शेड बाहेर थांबला.

“मी फक्त चवीपुरता एक लहानसा घास घेऊन बघतो.”

“वा! काय मस्त आहे!” आणि अँथनी आणखी एक एक घास घेऊ लागला.



“अरे बापरे! सगळंच संपलं की!” अँथनी त्याच्या हातातल्या रिकाम्या भांड्याकडे पाहून म्हणाला.

त्याने लगेच गवत आणि ओट्स बकरीच्या शेडबाहेरच्या खिडकीखाली ठेवले आणि तो पळून गेला.



स्वयंपाक घरातील पसारा आवरताना आजीला गावातल्या सगळ्या लोकांची आणि आपल्या प्राण्यांसाठी त्यांनी आज दिवसभर किती काम केले असणार त्याची आठवण झाली. अँथनी आणि तिच्याप्रमाणेच त्यांनीही अगदी साधेच जेवण केले असणार.

जादूच्या मंत्रांचे मोठे पुस्तक काढून जादूगार आजी म्हणाली, “आता मी सगळ्यांना एक भेट पाठवते.”



“आज रात्री सगळ्यांना मी एक छान स्वप्न पाठवते. छान जेवणाचे स्वप्न!”

गावातले लोक झोपी गेले तशी सगळ्यांना छान छान पदार्थांची स्वप्ने पडली. स्वप्नातल्या कारंज्यातून दूध आणि मध वाहत होता. भिंती निरनिराळ्या चीजच्या बनल्या होत्या. पलंगाचे खांब सॉसेजचे बनले होते तर चादरींएवढा लाझानिया तयार झाला होता!















गावातले लोक झोपेत असताना सगळे प्राणी गावातल्या चौकात जमून आपल्याला किती छान खाऊ मिळाला त्याची मिटक्या मारत चर्चा करत होते.



मठातली मांजरे म्हणाली, “आज आम्हाला किती चविष्ट तळलेले मासे मिळाले! बकरी ताई, तुला जादूगार आजीने काय दिले?”



“कोणास ठाऊक! अँथनीने सगळे मला न दाखवताच खाऊन टाकले.”

“हे काही बरोबर नाही, मग तू काय केलंस?” मेयरच्या कुत्र्याने विचारले.

“मी त्याचं पांघरूण खाऊन टाकलं. आता त्याला अशी थंडी वाजेल, की झोपच येणार नाही,” बकरीने उत्तर दिले.



आणि अँथनीला खरेच झोप आली नाही. आणि झोप आली नाही म्हणून त्याला स्वप्नात छान छान गोष्टी खायला पण मिळाल्या नाहीत.

त्याला थंडी तर वाजतच होती, आणि भूक पण लागली.



दुसऱ्या दिवशी सकाळी तीन राजांच्या सणाच्या दिवशी एकटा अँथनी सोडून गावातल्या सगळ्यांची पोटे जादूगार आजीने पाठवलेल्या स्वप्नातल्या मेजवानीने भरलेली होती.

तीन राजांचा म्हणजे एपिफानीचा उत्सव साजरा करायला गावातले लोक परत एकदा जादूगार आजीच्या घरी जमले.



प्रथम सर्वांनी केकचा एकेक तुकडा घेतला. ज्याच्या केकमध्ये मोठा बेदाणा येईल, तो त्या दिवशीचा राजा किंवा राणी.



“अरे हे पहा! अँथनी आज राजा आहे!” लोक आनंदाने ओरडले.

त्यांनी अँथनीला खांद्यावर उचलून टेबलाभोवती प्रदक्षिणा घातली आणि त्याला एका खास खुर्चीवर बसवले.









“अँथनी तू आज राजा आहेस, आणि तीन राजांनी येशू बाळासाठी भेटी आणल्या होत्या, म्हणून तुला आज काय भेट हवी ते सांग.” आजी म्हणाली.

“नवीन पांघरूण आणि… तू काल रात्री बकरीताईसाठी जो खास पदार्थ बनवला होतास ना तो!” अँथनीने आपली इच्छा सांगितली.

“देते की!” आजी म्हणाली.







“हे घे अँथनी राजा! छान सावकाश खा हं!” आजी म्हणाली.



“हो आजी. खूप खूप धन्यवाद!”

अँथनीने नवे पांघरूण अंगाभोवती गुंडाळले आणि बकरीताईकडे जाऊन तिच्या खिडकीवर टकटक केली.

आजीने केलेला खास पदार्थ अँथनीने बकरीताई समोर ठेवला. “माझं चुकलं! पण आता माझ्यावर रागावू नकोस गं!” अँथनी बकरीताईला प्रेमाने म्हणाला.

आणि सणासुदीचे दिवस असे संपले. आता परत पुढच्या वर्षी...